"केंद्र शासनाच्या कारागृह सुधारणा" या केंद्र पुरस्कृत (७५:२५) योजनेतर योजनेअंतर्गत २००४-२००५ च्या वर्षाकरिता निधी वितरण

*महाराष्ट्र शासन*
गृह विभाग
शासन निर्णय क्र. बीजीटी २००४/प्र.क्र.५१/पीआरएस-२
मंत्रालय, मुंबई-३२, दि. ६ सप्टेंबर, २००५

पहा :- १) केंद्र शासनाच्या गृह मंत्रालयाचे पत्र क्र. व्ही-११०१८/३१/२००२-पीआर, दिनांक २ सप्टेंबर, २००४

२) शासन निर्णय, गृह विभाग क्र. बीजीटी २००४/प्र.क्र.५१/पीआरएस-२, दिनांक, २९ ऑक्टोबर,२००४

३) केंद्र शासनाच्या गृह मंत्रालयाचे पत्र क्र. व्ही-११०१८/३१/२००२-पीआर, दिनांक ३१ मार्च २००५

४) केंद्र शासनाच्या गृह मंत्रालयाचे पत्र क्र. व्ही-११०१८/३१/२००२-पीआर, दिनांक १९ एप्रिल २००५

शासन निर्णय :- केंद्र शासनाच्या गृह मंत्रालयाने "कारागृह सुधारणा" ( ७५: २५) ही योजनेतर योजना नव्याने २००२-०३ या वर्षापासून सुरु केली असल्याचे कळविले असून सदर योजनेसाठी सन २००२ ते २००७ या ५ वर्षाकरिता राज्यास १) नवीन कारागृहाचे बांधकाम, २) अस्तित्वात असलेल्या कारागृहाची दुरुस्ती व नुतनीकरण, ३) स्वच्छता व पाणीपुरवठा व ४) कारागृह कर्मचाऱ्यांची निवासस्थाने इत्यादी संदर्भात सन २००२-०७ या पाच वर्षाच्या कालावधीसाठी अंदाजित रु. १२९.१६ कोटीची योजना मंजूर केल्याचे कळविले असून त्यामध्ये राज्य शासनाचा हिस्सा म्हणून रु. ३२.२८ कोटी इतका आहे. त्यापैकी सन २००४-०५ मध्ये केंद्रीय हिस्सा रु.१९३७.२५ लाख व राज्य शासनाचा हिस्सा रु.६४५.७५ लाख इतका आहे.

२. या योजनेच्या सन २००४-०५ च्या आराखड्याच्या अनुषंगाने केंद्र शासनाने उपरोक्त दि. २.सप्टेंबर.२००४ च्या पत्रान्वये केंद्र शासनाचा हिस्सा म्हणून रु.८.०० कोटी वितरीत केला होता. त्या निधीच्या अनुषंगाने केंद्रीय हिस्साच्या प्रमाणात राज्य शासनाचा २५ टक्के हिस्सा मिळवून केंद्र + राज्य हिस्सा अशी एकूण रु. १०,६६,६६,०००/- (रुपये दहा कोटी सहासष्ट लाख सहासष्ट हजार फक्त) इतकी रक्कम दि.२९ ऑक्टोबर, २००४ च्या शासन निर्णयान्वये कारागृह महानिरीक्षक यांचेमार्फत संबंधीत यंत्रणेस सूपूर्द करणेस मान्यता दिलेली आहे. राज्य शासनाचा सन २००४-०५ या वर्षासाठीच्या हिस्याचा उर्वरित रु.३,७९,०९,०००/- (रुपये तीन कोटी एकोणऐंशी लाख नऊ हजार फक्त) इतका निधी शिल्लक असून तो वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. कारागृह महानिरीक्षक यांनी कामनिहाय सदर निधी नियंत्रण अधिका-यामार्फत संबंधीत कार्यकारी अभियंता यांना तात्काळ वितरीत करावा व त्याबाबत काढलेल्या आदेशाची प्रत शासनास सादर करावी.

३. या योजनेच्या खर्चाचे तसेच विहित नमून्यातील उपयोगीता प्रमाणपत्र, तिमाही प्रगती अहवाल कारागृह महानिरीक्षक यांनी संबंधीत कार्यकारी अभियंता यांचेकडून वेळीच प्राप्त करुन घेऊन शासनास सादर करावा.

४. या योजनेतील बांधकाम व इतर बाबीसंबंधी कामे सार्वजनिक बांधकाम विभागाकडून "ठेव अंशदान बांधकामे" (Deposit Contribution works) पध्दतीने करण्यात येते व याबाबतचे अनुदान नियंत्रक अधिकाऱ्यांमार्फत संबंधित कार्यकारी अभियंता यांना वितरीत करण्यात येईल. याबाबत होणारा खर्च मगणी क्र. बी-५ मुख्यलेखाशिर्ष "२०५६-तुरुंग, १०१- तुरुंग, केंद्रपुरस्कृत योजना, (००)(०९) कारागृह सुधारणा योजना (२०५६-०१८-९) योजनेतर/ दत्तमत" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून सन २००५-०६ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाचे अनौपचारीक संदर्भ क्र.सीआर-४७१/०५/ व्यय-८, दि.२५.८.२००५ अन्वये दिलेल्या मंजूरीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

( आ. ग. परदेशी )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन, गृह विभाग

प्रत,

- कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
- कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय), महाराष्ट्र राज्य, पुणे.
- सर्व कारागृह उपमहानिरीक्षक
- महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
- महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर.
- जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
- उप सचिव, इमारती-२, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
- अवर सचिव, बीयुडी-१, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
- उप अभियंता, कारागृह महानिरीक्षणालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
- वित्त विभाग, (व्यय-८), मंत्रालय, मुंबई-३२.
- निवड नस्ती, पीआरएस-२, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

****